मदत व पुनर्वसन प्रभागातंर्गत राज्यातील दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करण्यासाठी Geo-Portal विकसित करण्याच्या ई-प्रशासन प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.......

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०१७/प्र.क्र.२२२/म-७**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ३० जून, २०१८

वाचाः-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक:मातंस/नस्ती-२०१०/प्र.क्र.३४/३९, दिनांक १८.०६.२०१०
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक :सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दिनांक २९.१०.२००१
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक :सीओएम-१०९८/प्र.क्र.५१/९८/३९, दिनांक १५.०२.२००५
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक:मातंस/नस्ती-२०१०/प्र.क्र.३४/३९, दिनांक १८.०६.२०१०
५) शासन निर्णय, समक्रमांक , दिनांक १६.०४.२०१८

**प्रस्तावना :-**

राज्याचे प्रशासन अधिक गतिमान तसेच लोकाभिमुख करण्याच्या दृष्टीने माहिती तंत्रज्ञानाचा सुयोग्य वापर व्हावा यासाठी प्रशासकीय कामकाजाचे संगणकीकरण करण्याचे शासनाचे धोरण आहे. त्यानुसार शासनामार्फत जनतेस दिल्या जाणा-या सेवा अधिक गतीने व किफायतशीर रित्या देण्यासाठी विविध मंत्रालयीन विभागाच्या व त्यांच्या नियंत्रणाखालील क्षेत्रीय कार्यालयामध्ये ई-गव्हर्नन्सचा जास्तीत जास्त वापर करण्याबाबत माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने सूचना दिल्या आहेत. त्यानुसार मदत व पुनर्वसन प्रभागातंर्गत ई-प्रशासन प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन क्रमाक ५ येथील दि. १६.०४.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आली आहे.

२. राज्यांमध्ये दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करण्यासाठी केंद्र शासनाने दुष्काळ व्यवस्थापन संहिता २०१६, डिसेंबर २०१६ मध्ये प्रकाशित केली आहे. सदर संहितेमध्ये दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करण्यासाठी अनिवार्य व प्रभावदर्शक निर्देशांक विहित करण्यात आलेल्या आहेत. सदर शास्त्रीय निर्देशांक विचारात घेवून दुष्काळ निश्चित करावयाचे आहे. या

प्रक्रियेमध्ये कमीतकमी मानवी हस्तक्षेप रहावा व मानवी चुका होवू नयेत दुष्काळी परिस्थितीचे वस्तुनिष्ठ मुल्यांकन करता यावे याकरिता या कामासाठी पुर्णत: समर्पित असलेली Geo-Portal प्रणाली नियोजन विभागाच्या अधिपत्याखाली असलेल्या महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग अप्लीकेशन सेंटर, नागपूर (MRSAC) यांच्या सहभागाने विकसित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> -**

राज्यातील दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करण्यासाठी Geo-Portal प्रणाली विकसित करणे या ई-प्रशासन प्रकल्पासंदर्भात महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग अप्लीकेशन सेंटर, नागपूर यांनी तयार केलेला प्रस्तावावर दिनांक २२.०६.२०१८ रोजी झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीमध्ये चर्चा करण्यात आली. प्रकल्प अंमलबजावणी समितीने सदर ई-प्रशासन प्रकल्प राबविण्यास मान्यता दिली आहे. तसेच सदर ई-प्रशासन प्रकल्प राबविण्याकरिता येणाऱ्या रू. ४२.५० लक्ष (रू बेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त) खर्चास देखील प्रकल्प अंमलबजावणी समितीने मान्यता दिली आहे. प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिलेली मान्यता विचारात घेवून राज्यातील दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करण्यासाठी Geo-Portal विकसित करावयाच्या ई- प्रशासन प्रकल्पास व त्याकरिता होणाऱ्या रू ४२.५० लक्ष (रू बेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ई-प्रशासन प्रकल्प राबविण्यासाठी होणारा खर्च खालील पध्दतीने महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग अप्लीकेशन सेंटर, नागपूर यांना प्रदान करण्यात यावा :

| अ.क्र. | टप्पा | प्रदान करावयाची रक्कम |
|---|---|---|
| १ | After signing of MOU and initiation | रू. २५,५०,०००/- |
| २ | After completion of documentation, user acceptance test and GO LIVE | रू ८,५०,०००/- |
| ३ | On completion of one year from GO LIVE | रू. ८,५०,०००/- |
| **एकूण** | | **रू. ४२,५०,०००/-** |

३. सदर प्रणाली विकसित झाल्यानंतर ही प्रणाली क्लाऊड बेसड सर्व्हरवर टाकण्यासाठी होणारा खर्च स्वतंत्र राहील व राज्य शासनाच्या धोरणानुसार ही कार्यवाही करण्यात यावी. या प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी

सहाय्य, ८०, सर्वसाधारण, ००१ संचालन व प्रशासन, (०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, (०१)(०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधन साम्रगीसह सुसज्जीकरण करणे (२२४५ १७६१) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विपअ-२०१३/ प्र.क्र. ३०/२०१३/विनियम दिनांक १७.०४.२०१५ च्या परिशिष्टातील वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीनच्या अनुक्रमांक चार मधील परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७०२११२०४७४७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2018.07.02 11:21:53 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव
२. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (उद्योग) उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव ( महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उप महासंचालक, युनिक आयडेंटिटी ऑथॉरिटी ऑफ इंडिया, पश्चिम क्षेत्र, मुंबई
८. राज्य सूचना अधिकारी, राज्य सूचना विज्ञान केंद्र , मुंबई
९. संचालक,महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग सेंटर, नागपूर
१०.महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर
११.महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४.सर्व विभागीय आयुक्त
१५.सर्व जिल्हाधिकारी
१६.संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१७. वित्तिय सल्लागार व सहसचिव, मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१८. मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
१९.मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
२०. मदत व पुनर्वसन प्रभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी
२१.अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक
२२.निवड नस्ती (कार्यासन म-७).